जलसंपदा विभागासाठी सर्वकष स्वतंत्र नियमावली (WR Manual) तयार करण्याकरिता व नियमावलीच्या प्रारुप मसुद्यामध्ये सुधारणा करण्यासाठी समिती गठित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन परिपत्रक क्र. समिती -२०१४/प्र.क्र. ३४१/१४/मो.प्र.१**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ४ फेब्रुवारी, २०२०.**

**वाचा:** १) शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक ०५/१२/२०१४
२) शासन परिपत्रक समक्रमांक, दिनांक १६/०१/२०१५

**शासन परिपत्रक:**

जलसंपदा विभाग,शासन निर्णय, दिनांक ०५/१२/२०१४ अन्वये जलसंपदा विभागासाठी सर्व समावेशक स्वतंत्र नियमावली तयार करण्यासाठी (WR Manual) मा. श्री. एस. एन. सहस्त्रबुध्दे (निवृत्त कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग) यांच्या अध्यक्षतेखाली अनुभवी व ज्येष्ठ असे १५ अभियंता/ सदस्य असलेली समिती गठीत करण्यात आली होती. त्यानंतर शासन परिपत्रक, दिनांक १६/०१/२०१५ नुसार समितीच्या रचनेत प्रशासकीय कारणास्तव अंशत: बदल करुन समितीच्या अध्यक्षपदी मा. श्री. अ. पां. भावे, निवृत्त सचिव (लाक्षेवि) जसंवि यांची नियुक्ती करण्यात आली होती. या समितीत सचिव अथवा समकक्ष पदावरुन सेवानिवृत्त झालेले तीन सदस्य, मुख्य अभियंता पदावर कार्यरत तीन सदस्य, अधीक्षक अभियंता पदावर कार्यरत दोन सदस्य, संचालक, लेखा व कोषागार, विभागीय लेखाधिकारी अशा प्रकारच्या मोठया प्रमाणात क्षेत्रिय अनुभव असलेल्या अभियंत्यांचा सदस्य म्हणून समावेश होता. समितीने नियमावली (Manual) तयार करुन त्यांचा अहवाल दि. २९/११/२०१६ रोजीच्या पत्रान्वये शासनाला सादर केला आहे.

दरम्यानच्या काळात निविदा विषयक कार्यवाही करण्याबाबतचे धोरणात्मक निर्णय शासन स्तरावर घेण्यात आले आहेत. सदर निर्णयाच्या अनुषंगाने प्रस्तूत नियमावलीच्या प्रारुप मसुद्यामध्ये सुधारणा करणे आवश्यक आहे. त्यानुसार जलसंपदा विभागासाठी सर्वकष स्वतंत्र नियमावलीच्या प्रारुप मसुद्यामध्ये सुधारणा करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | कार्यालयाचे नांव | पद |
|---|---|---|---|
| १ | श्री. आर. आर. शहा | मुख्य अभियंता (स्थापत्य), जलविद्युत प्रकल्प व गुणनियंत्रण, पुणे | अध्यक्ष |
| २ | श्री. अं. का. देसाई | अधीक्षक अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प मंडळ, नागपूर | सदस्य |
| ३ | श्री. प्रवीण कोल्हे | अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे | सदस्य |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | श्री. प्र. बा. मिसाळ | अधीक्षक अभियंता, उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा ठाणे | सदस्य |
| ५ | श्री. एम. व्ही. कुलकर्णी | अधीक्षक अभियंता,बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ, परळी वैजनाथ | सदस्य |
| ६ | श्री. आ. श्री. मोरे | अधीक्षक अभियंता, जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव | सदस्य |
| ७ | श्री. सं. मा. सांगळे | अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा:**

जलसंपदा नियमावलीचा मसुदा शासनास सादर झाल्यानंतर शासन स्तरावरुन निर्गमित करण्यात आलेल्या निविदा विषयक धोरणात्मक निर्णयांचा आढावा घेऊन त्यानुसार प्रारुप नियमावलीत दुरुस्ती करणे.

**कालावधी:**

समितीला जलसंपदा विभागासाठी सर्वंकष स्वतंत्र नियमावली (Manual) मध्ये सुधारणा/दुरुस्ती करण्यासाठी एक महिन्याचा कालावधी विहीत करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२००२०५१४५९४४६३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, serialNumber=8a9bdce987e31fe4e079969a0eb71bce94df0f9984bd752cc203bcd86349bbb5, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2020.02.05 15:02:18 +05'30'

**( म. ई. धरणे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा),जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
२. स्वीय सहायक, सचिव (प्रकल्प समन्वय) जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
३. स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि) जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई
४. महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था नाशिक.
५. सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे.
६. स्वीय सहायक, सर्व मुख्य अभियंता व सहसचिव जलसंपदा विभाग, मंत्रालय मुंबई.
७.स्वीय सहायक सर्व उपसचिव जलसंपदा विभाग मंत्रालय मुंबई.

प्रत:- मोप्र-१ कार्यासन संग्रहार्थ.